कार्यकारी अभियंता (स्थापत्य)
यांच्या बदल्या / पदस्थापना.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

**शासन आदेश क्रमांकः टीएफएस-१११७ / प्र.क्र. १२ (३)/ सेवा-१**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

तारीख: ११ जानेवारी, २०१७

**शासन आदेश :**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) व ४ (५) मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने, सार्वजनिक बांधकाम विभागातील श्री. योगेश बा. कुलकर्णी, कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद, जळगांव यांची बदली सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या कारणास्तव कार्यकारी अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, नाशिक या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

२. कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद, जळगांव या पदावर अन्य अधिकाऱ्याची स्वतंत्रपणे नेमणूक करण्यात येईल.

३. संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी श्री. कुलकर्णी यांना नवीन नियुक्तीच्या ठिकाणी कार्यभार घेता यावा म्हणून, आवश्यक ती स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन सध्याच्या पदभारातून तात्काळ पदमुक्त करावे व त्यांना नवीन नेमणूकीच्या जागी ताबडतोब रुजू होण्यास सांगावे.

४. श्री. कुलकर्णी यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा. तसेच त्यांनी अनधिकृतरित्या गैरहजर राहू नये अन्यथा त्यांची अनुपस्थिती अनधिकृत गैरहजेरी म्हणून समजण्यात येईल व विनावेतन करण्यात येईल तसेच त्यांच्या सेवेत खंड पडण्याची शक्यता नाकारता येत नाही याची जाणीव संबंधितांना करुन देण्यात येत आहे. तसेच, त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक सीडीआर-१०८२/ २५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे. सदर परिपत्रकान्वये दिलेल्या सूचना लक्षात घेता, त्यांनी बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील, याची त्यांनी नोंद घ्यावी.

५. संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी पदमुक्त व पदमोचक अधिकाऱ्यांनी अनुक्रमे पदभार सोडल्याचा तसेच स्वीकारल्याचा दिनांक त्वरित शासनास doser1.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल पत्त्यावर कळवावा. विहीत कालावधीत अधिकारी रुजू न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरित अवगत करण्यात यावे, जेणेकरुन संबंधितांविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई त्वरित करणे शक्य होईल. म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार बदली झालेल्या अधिकाऱ्याचा रजा अर्ज स्वीकारु नये / मंजूर करु नये.

६. श्री. कुलकर्णी यांची बदली प्रशासकीय कारणास्तव करण्यात येत असल्याने त्यांना नियमानुसार अनुज्ञेय असणारा पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता देय राहतील.

७. श्री. कुलकर्णी यांनी नवीन नियुक्तीच्या पदाचा पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप, पुणे यांना कळवावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०११२१५४१०१९४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sampat D Suryawanshi

Digitally signed by Sampat D Suryawanshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=PW D, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e2d0677dc3b9f523d6452edd479c3b2edc0887c9102b4130ae3ef3dd803b7322, cn=Sampat D Suryawanshi
Date: 2017.01.12 15:47:41 +05'30'

**( सं.द.सुर्यवंशी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
२. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जळगांव,
३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपुर/ विशेष प्रकल्प, मुंबई/ राष्ट्रीय महामार्ग, नवी मुंबई,
४. मुख्य अभियंता (विद्युत), मुंबई,
५. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
६. संचालक, उपवने व उद्याने, मुंबई,
७. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप पुणे,
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा ) महाराष्ट्र-१, मुंबई,
९. जिल्हा कोषागार अधिकारी, जळगांव / नाशिक,
१०. श्री. योगेश बा. कुलकर्णी, कार्यकारी अभियंता, दक्षता व गुणनियंत्रण मंडळ, नाशिक,
११. मा. मंत्री, सा.बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१२. मा. मंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१३. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम वगळून) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१४. मा. राज्यमंत्री, सा. बां. (सार्वजनिक उपक्रम) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई,
१५. प्रधान सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
१६. सचिव ( रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई, यांचे स्वीय सहायक,
१७. सर्व सह सचिव / उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१८. सार्वजनिक बांधकाम विभाग / आस्था-१, आस्था-३, सेवा-६, संगणक कक्ष, मंत्रालय, मुंबई,
१९. निवडनस्ती.